

# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

१३) श्री गणेश भुजङ्गस्तोत्रम् -१

रणत्क्षुद्रघंटानिनादाभिरामं
चलत्तांडवोद्दण्डवत्पद्मतालम् !!
लसत्तुन्दिलाङ्गोपरिव्यालहारं !
गणाधीशमीशानसूनुं तमीडे !!१!!

भगवान गणेशाचे हे स्तोत्र जगद्गुरु शंकराचार्यांनी ज्या वृत्तात रचले त्या नावानेच ते विख्यात झाले आहे. या स्तोत्राचे वृत्त आहे भुजंगप्रयात. भुजंग अर्थात सर्प. तो जात असताना ज्या प्रकारच्या वळणांचा उपयोग करतो तशी वळण घेत जाणारी ही शब्दावली. त्यामुळेच या वृत्ताला भुजंग प्रयात असे म्हणतात.

आपल्याला चिरपरिचित असणारी या वृत्तातील रचना म्हणजे श्री समर्थांचे मनाचे श्लोक.

अशा भुजंगप्रयात वृत्तात केलेल्या या रचनेत जगद्गुरु आदि शंकराचार्य स्वामी महाराज भगवान गणेशांच्या सुंदर चाली चे वर्णन प्रथम श्लोकात करीत आहेत.

रणत्क्षुद्रघंटानिनादाभिराम- कोणाचेही चालणे दिसण्याच्या आधी ऐकू येते. पायांचा आवाज येतो. त्यातील पैंजणांचा आवाज येतो.

त्या पैंजणा मध्ये लावलेल्या छोट्या छोट्या घुंगरांना क्षुद्रघंटा असे म्हणतात. त्या हलत असणाऱ्या घंटांच्या अत्यंत आकर्षक असणाऱ्या निनादाने युक्त अशी चाल असणारे भगवान गणेश 'रणत्क्षुद्रघंटानिनादाभिराम' ठरतात.

चलत्तांडवोद्दण्डवत्पद्मताल- उद्दंड म्हणजे ज्यांच्यावर कोणाचाही दंड चालत नाही. कोणाचाही अधिकार चालत नाही. जे आपल्या प्रत्येक कृतीला स्वाधीन असतात. आपल्याच आनंदात ती कृती करतात असे.

अशा आपल्याच आनंदात उचललेल्या पावलांनी चालत येणारे भगवान श्री गणेशांची चरणकमले जणू तांडव नृत्य करीत आहेत असे वाटते.

आनंदाचे सर्वोच्च प्रगटन आहे नृत्य. मोरयाचे सहज चालणे देखील नृत्य वाटते. तितका आनंद त्या चालीत आहे.

लसत्तुन्दिलाङ्गोपरिव्यालहार- आपल्या तुंदिल अर्थात भरगच्च, मांसभरित पोटाच्या भोवताल ज्यांनी व्याल अर्थात सर्पाचे वेस्टन गुंडाळले आहे असे.

गणाधीशमीशानसूनुं तमीडे - या अंतिम ओळीत आचार्य श्री म्हणतात, भगवान शंकरांच्या घरी झालेल्या आणि अवतारात त्यांचे पुत्र झालेल्या, शिवपुत्र गणेशांची मी वंदना करतो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

१४) श्री गणेशभुजङ्गस्तोत्रम्- २

ध्वनिध्वंसवीणालयोल्लासिवक्त्रं !
स्फुरच्छुण्डदण्डोल्लसद्बीजपूरम् !!
गलद्दर्पसौगन्ध्यलोलालिमालं !
गणाधीशमीशानसूनुं तमीडे !!२!!

ध्वनिध्वंसवीणालयोल्लासिवक्त्र- वक्त्र अर्थात मुखारविंद. उल्लासि अर्थात आत्म प्रसन्नतेने फुलून आलेले.

ध्वनिध्वंस अर्थात ध्वनी चा विनाश करणारे.कोणता ध्वनी? तर वीणालय- अर्थात वीणा इ.वाद्यांचा लयबद्ध ध्वनी.

अर्थात त्यांच्या प्रसन्न मुखकमलातून निघालेल्या ध्वनीने वीणा इ. वाद्यातून प्रगट होणार्या लयबद्ध ध्वनीचा विनाश केला आहे. अर्थात ते सर्व ध्वनींचे सौंदर्य मोरया च्या आवाजा समोर विलुप्त होते हा भाव.

स्फुरच्छुण्डदण्डोल्लसद्बीजपूर- भगवान गणेशांचे सगळ्यात सुंदर वैभव आहे त्यांची सोंड. त्या चैतन्यकंद मोरयाची शुंडा सदैव फुरफुरत असते. त्या शुंडा दंडामध्ये मोरयाने बीजपूर नामक फळ धारण केले आहे.

बीजपूरक म्हणजे महाळुंग.हे नाव मोठे सुंदर आहे. बीजपूरक अर्थात बीयांने परिपूर्ण भरलेले. भगवंताला फळ समर्पित करताना त्यात जितक्या अधिक बिया असतील तितके सुयोग्य वर्णिले आहे. त्यामुळेच मोरयाला डाळिंब, महाळुंग, कवठ, सिताफळ इ. फळांना प्राधान्य द्यावे.

बीज शब्दाचा दुसरा अर्थ इच्छा असा पण आहे. आपल्या इच्छाच आपल्या जीवनाचे,जन्माचे बीज आहे. भक्तांच्या अशा सगळ्या इच्छा पूर्ण करणारे मोरयाच्याच हातात आहे हे दाखविण्याची पद्धत आहे बीजपूरक धारण.

गलद्दर्पसौगन्ध्यलोलालिमाल- भगवान गणेशांच्या गज मस्तकावरून सतत मद पाझरत असतो. त्या गळणाऱ्या मदाच्या सुगंधाने आकर्षित झालेल्या भुंग्यांच्या रांगांच्या रांगा जेथे घुटमळत राहतात त्या मोरयाला गलद्दर्पसौगन्ध्यलोलालिमाल असे म्हणतात.

अशा स्वरूपानेयुक्त असणाऱ्या, विविध अवतारांचा स्वरूपात शिवपुत्र असणाऱ्या भगवान श्री गणेशांची मी स्तवन करतो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

१५) श्री गणेश भुजङ्गस्तोत्रम् -३.

प्रकाशज्जपारक्तरत्नप्रसून-
प्रवालप्रभातारुणज्योतिरेकम् !
प्रलम्बोदरं वक्रतुण्डैकदन्तं !
गणाधीशमीशानसूनुं तमीडे !! ३!!

भगवान गणेशांचा आवडता रंग लाल आहे आपल्या सगळ्यांनाच ज्ञात आहे.पण लालच का असे म्हटले तर?

लक्षात घ्या लाल हा थांबण्याचा रंग आहे. लाल दिवा लागला की थांबायचं. जगातील कोणत्याही भाषेतील कोणतेही यंत्र असो. त्याच्यावर लिहिलेल्या सूचना तुम्हाला वाचता येवो अथवा न येवो. ते बंद करण्याचे बटन लालच असते हे नक्की.

लाल हा थांबण्याचा रंग आहे. त्यामुळेच भगवान गणेशांचा रंग लाल आहे. कारण त्यांच्या पाशी आले की थांबायचे आहे. आता पुढे जायला नाहीच काही. हेच सर्वोच्च तत्व. हेच अंतिम तत्त्व. त्यामुळे ते लाल आहेत.

मोरयाचा केवळ रंगच लाल आहे असे नाही तर रक्तगंध, रक्तपुष्प, रक्तवस्त्र इ. त्यांच्या आवडीच्या गोष्टी देखील लाल आहेत.

अशा अनेक लाल गोष्टीचे, तेजस्वी लाल बाबींचे वर्णन करून त्यांच्याहीपेक्षा लाल असे म्हणत आचार्यश्री मोरयाच्या परम आकर्षक रूपांचे वर्णन करीत आहेत.

जपा म्हणजे जास्वंदीचे फूल, रक्तरत्न म्हणजे माणिक नावाचे रत्न,प्रसून शब्दाचा सामान्य अर्थ फुल असा आहे. पण जास्वंदीच्या फुलाचा उल्लेख वर आला आहे त्यामुळे येथे प्रसून अर्थात लाल रंगाचे फूल म्हणजे रक्तकमल किंवा लालगुलाब.

पप्रवाल म्हणजे पोवळे नावाचे रत्न. प्रभातारुण- अर्थात सकाळी सूर्योदयाच्या पूर्वी पसरणारी लालिमा. अरुण हा सूर्याचा सारथी. सारथी आधी येतो नंतर रथी. त्यामुळे आधी अरुणोदय नंतर सूर्योदय. त्या अरुणाची किंवा सकाळच्या उगवत्या सूर्याची लालिमा.

ज्योतिरेक- या सर्व लाल पदार्थांची सूची देऊन शेवटी आचार्यश्री हा शब्द वापरतात. या सगळ्यांची ज्योती अर्थात तेज एकत्र केल्यावर निर्माण होईल तशा रंगाचे. किंवा ज्यांच्या रंगा समोर या सर्व गोष्टींचे रंग फिके पडतात असे आहेत भगवान गणेश.

ते लंबोदर आहेत. अर्थात सर्व विश्वाला उदरात सामावणारे आहेत.

ते वक्रतुंड आहेत. अर्थात मायेचा नाश करणारे आहेत.

ते एकदंत आहेत. अर्थात त्याची एकट्याचीच सत्ता आहे.

अशा या शिवसुत रूपात अवतीर्ण होणार्या भगवान गणेशांचे मी स्तवन करतो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

१६) श्री गणेश भुजंगस्तोत्रम् - ४

विचित्रस्फुरद्रत्नमालाकिरीटं !
किरीटोल्लसच्चंद्ररेखाविभूषम् !!
विभूषैकभूषं भवध्वंसहेतुं !
गणाधीशमीशानसूनुं तमीडे !!४!!

विचित्रस्फुरद्रत्नमालाकिरीट- संस्कृत भाषेतील जे शब्द मराठी भाषेत वापरले तर पूर्ण वेगळाच भाव प्रकट होतो त्यापैकी एक शब्द म्हणजे विचित्र.

मराठीत विचित्र हा शब्द अनाकलनीय,अजब, विक्षिप्त, गूढ असा काहीसा नकारात्मक अर्थाने वापरतात.

मात्र संस्कृतमध्ये तो शब्द पूर्ण वेगळ्याच अर्थाने आणि अत्यंत सकारात्मक अर्थाने आहे. चित्र शब्दाचा अर्थ रंगीबेरंगी गोष्ट. आकर्षक गोष्ट. त्याला विशेष या अर्थाने वि उपसर्ग लावला. अर्थात विशेष आकर्षक ते विचित्र. विशेष रंग युक्त ते विचित्र. विशेष सौंदर्यपूर्ण ते विचित्र.

अशा अत्यंत सौंदर्यपूर्ण स्वरूपाच्या विविध रत्नांच्या माळा, विविध रंगांचे तेजस्वी परावर्तन करणाऱ्या रत्नांच्या माळा ज्या श्रीमोरयाच्या किरीट अर्थात मुकुटावर लावलेल्या, सोडलेल्या आहेत त्या श्रीगणेशांना विचित्रस्फुरद्रत्नमालाकिरीट असे म्हणतात.

किरीटोल्लसच्चंद्ररेखाविभूष- भगवान गणेशांच्या त्या मुकुटावर चकाकणारी चंद्रकोर शोभा वृद्धिंगत करीत आहे.

याच कारणाने भगवान गणेशांना भालचंद्र असे म्हणतात. त्यांनी भाळावर अर्थात मस्तकावर चंद्र धारण केला आहे असे. चंद्राप्रमाणे उज्वल, प्रकाशित, शांत, शीतल, मनोहारी ज्यांचे मस्तक ते भालचंद्र.

विभूषैकभूष- विभू म्हणजे परमव्यापक श्रेष्ठ. असे जे अत्यंत विशेष भूषण ते विभूष. असे आभूषण आहे भगवान श्री गणेशांच्या गळ्यातील चिंतामणी रत्न. त्या एकाच आभूषणांने शोभून दिसणारे.

भवध्वंसहेतु - भव अर्थात हा संसार. या संसाराचा लय ज्यांच्या चरणकमलाशी होतो त्या भगवंताला भवध्वंसहेतु असे म्हणतात. ते भगवानच या संसाराच्या निर्मितीचे कारण आहेत आणि विनाशाचे देखील.

अनेक अवतार घेऊन शिवसुत म्हणविल्या जाणाऱ्या त्या भगवान गणाधीशांचे मी वंदन करतो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

## १७) श्री गणेश भुजंगस्तोत्र ५

उदञ्चद्भुजावल्लरीदृश्यमूलो
च्चलद्भ्रूलताविभ्रमभ्राजदक्षम् !!
मरुत्सुंदरीचामरैः सेव्यमानं !
गणाधीशमीशानसूनुं तमीडे !! ५!!

भगवान श्रीगणेशांच्या निवास लोकांला 'श्रीस्वानंदलोक' असे म्हणतात. तेथे भगवान गणेश आपल्या सहस्रदल कमळावर विराजमान असतात. त्यांच्या सेवेसाठी अष्ट महानायिका सुसज्ज असतात. विविध साधनांनी त्या भगवंताची सेवा करतात. त्या सेवा करणाऱ्या दिव्य अप्सरांचे वर्णन प्रस्तुत श्लोकात भगवान जगदुरु आदि शंकराचार्य स्वामी महाराजांनी केलेले आहे.

उदञ्चद्भुजावल्लरीदृश्यमूल- पूज्य आचार्य श्री शब्द योजतात 'भुजावल्लरी'. वल्लरी शब्दाचा एक अर्थ आहे स्त्री. तो घेतला तर भुजावल्लरी याचा अर्थ स्त्रियांचे हात. त्याचप्रमाणे वल्लरी शब्दाचा दुसरा अर्थ आहे वेल. तो स्वीकारला तर भुजावल्लरी म्हणजे वेलीं प्रेमाणे नाजूक असणारे हात. गंमत म्हणजे दोन्ही लागू पडतात. तसेच दोन्हीचे एकत्रीकरण करून 'स्त्रियांचे वेलीप्रमाणे नाजूक हात.' असा अधिक सुंदर अर्थ होतो. असे ते हात उंच उभारल्यामुळे सुंदर दिसणारे दृश्य ते, उदञ्चद्भुजावल्लरीदृश्यमूल.

च्चलद्भ्रूलताविभ्रमभ्राजदक्ष- भ्रू अर्थात भुवई. त्यांची नाजुक सुंदर रचना म्हणजे भ्रूलता. त्यांनी नेत्रांनी जे एक कटाक्ष टाकले जातात ते भ्रूलताविभ्रम. हे नेत्र चंचल असल्यामुळे त्याचाही उल्लेख केला.

भ्राज शब्दाचे नाजूक आणि सुंदर असे दोन अर्थ आहेत. नेत्र कटाक्षांना ते दोन्ही लागू पडतात.

अशा नेत्र कटाक्षां मध्ये त्या सेविका दक्ष असल्याने, च्चलद्भ्रूलताविभ्रमभ्राजदक्ष.

मरुत्सुंदरीचामरैः सेव्यमान- मरुत् अर्थात देवता. त्या स्वर्गीय दैवी सुंदरी, मरुत्सुंदरी. त्यांनी मोरयाला वारा घालण्यासाठी हातात चवरी घेतली आहे. त्या ज्यांची सेवा करतात ते मरुत्सुंदरीचामरैः सेव्यमान.

भगवान शंकरांच्या घरी अनेक अवतार घेतल्याने शिवसुत म्हणविल्या जाणाऱ्या या गणाधीशाची वंदना करतो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

१८) श्री गणेश भुजंगस्तोत्र ६

स्फुरन्निष्ठुरालोलपिङ्गाक्षितारं !
कृपाकोमलोदार लीलावतारं !!
कलाबिंदुगं गीयते योगिवर्यै-
र्गणाधीशमीशानसूनुं तमीडे !! ६!!

स्फुरन्निष्ठुरालोलपिङ्गाक्षितार- अक्ष म्हणजे डोळा. त्यातील तार म्हणजे आतले बुबुळ. ते पिङ्ग अर्थात भुरकट लाल, तांबडे झाले आहेत असे. आलोल अर्थात चंचल. थरथरणारे.

स्फुरत् शब्दातही तोच भाव आहे. जणू ती थरथर दुप्पट दाखवण्यासाठी.

डोळे लालहोऊन थरथर केव्हा करतात? तर राग आल्यावर. संताप आल्यावर.

ही पहिली ओळ दुष्टांसाठी आहे. त्यांना पाहिल्यावर त्यांचे डोळे लाल होतात आणि थरथरतात असे ते स्फुरन्निष्ठुरालोलपिङ्गाक्षितार.

दुसरी ओळ मात्र सज्जनांसाठी आहे. भक्तांसाठी आहे.

कृपाकोमलोदारलीलावतार- त्या भक्तांवर कृपा करतांना, दृष्टी अत्यंत कोमल ठेवणारे, त्या भक्तांच्या करिता उदार अशा लीला करणारे ते कृपाकोमलोदारलीलावतार.

कलाबिंदुग - हा शब्द व्यवस्थित समजून घ्यायला हवा. यात कला म्हणजे चंद्रकोर. बिंदू अर्थात अनुस्वार. या दोन्हींनी युक्त असा ग म्हणजे कलाबिंदुग.

अर्थात भगवान गणेशांचा एकाक्षरी महामंत्र. पण तो सरळ न सांगताना असा कला, बिंदू युक्त ग असा सांगितला. कारण मंत्र असा केव्हाही, कोणीही, कुठेही उच्चारायचा नसतो. मंत्र श्री गुरूंनी शिष्याला देण्याचा विषय आहे.

मंत्र हा शब्द देखील मोठा सुंदर आहे. 'मननात् त्रायते!' अर्थात चिंतन-मनन केल्याने साधकांना तारून नेणारा तो मंत्र. कशाचे चिंतन-मनन? तर गणेशांच्या एकाक्षरी मंत्राचे. कसे करायचे? तर एक मार्ग असा आहे की ओंकार आणि गणेश एकाक्षरी मंत्र हे दोन्ही समान आहेत. या दोन्हींच्या उच्चारांची मिळणारी स्पंदने समान आहेत. म्हणजे एकाक्षरी मंत्र आणि ओंकार एकच आहेत. म्हणजेच भगवान गणेश आणि ओंकार एकच आहेत. देवा तूंचि गणेशु ! अशा स्वरूपात श्री ज्ञानेश्वर महाराज हे एकत्व सांगतात.

असे श्री मोरया चे ओंकार ब्रह्मत्व कथन करणारा हा मंत्र.

अशा त्या मंत्राच्या द्वारे योगी लोक त्या भगवान गणेशांच्या वैभवाचे गायन करतात. अर्थात अत्यंत आनंदाने त्या मोरयाला आळवत राहतात.

विविध अवतारांच्या रूपात शिवपुत्र झालेल्या त्या श्री गणेशांची मी वंदना करतो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

१९) श्री गणेश भुजंगस्तोत्रम् -७

यमेकाक्षरं निर्मलं निर्विकल्पं !
गुणातीतमानन्दमाकारशून्यम् !!
परं पारमोंकारमाम्नायगर्भं !
वदन्ति प्रगल्भं पुराणं तमीडे !!७!!

भगवान श्री गणेशाच्या निर्गुण-निराकार स्वरूपाला अत्यंत सुस्पष्ट रीतीने आपल्या समोर ठेवणारा हा श्लोक.

यमेकाक्षरं - या पहिल्याच पदात भगवान जगद्गुरु आदि शंकराचार्य स्वामी महाराज श्री गणेशांच्या ओंकार स्वरूपाचे वर्णन करीत आहेत. एकाक्षर हा शब्द ॐ कारा करिता योजिला जातो. ' ॐ इति एकाक्षरं ब्रह्म ! ' अशी शास्त्राची स्पष्ट कथनी आहे. ॐकारालाच एकाक्षर ब्रह्म असे म्हणतात. तेच श्री गणेशांचे स्वरूप आहे. श्री गणेशच ॐकार ब्रह्म आहेत.

निर्मल- शास्त्रामध्ये मायेलाच मळ असे म्हटले आहे. त्या मायेच्या पार असणारे, मायामल विरहित शुद्ध परब्रह्म आहे निर्मल.

निर्विकल्पं- निर्विकल्प अर्थात पर्यायरहित. विकल्प शब्दाचा अर्थ आहे दोन किंवा अधिक पैकी एक निवडण्याची समस्या. 'हे की ते?' हे आहे विकल्पाचे स्वरूप. मोरया च्या सोबत अन्य कोणत्याही बाबतीत पर्यायच नाही. ते एकमेवाद्वितीय असल्याने त्यांना निर्विकल्प असे म्हणतात.

गुणातीत- तिन्ही गुणांच्या अतीत.

आनंद हेच ज्यांचे स्वरुप आहे.

आकार शून्य- साकारतेच्या पार, निराकार. आकारासह ते सगुण- साकार. मोरया निर्गुण निराकार. त्यामुळे आकारशून्य.

परं पार - सर्वाधिक श्रेष्ठ ते पार. त्याच्याही पलीकडे परं पार. ज्येष्ठाहून ज्येष्ठ. ज्येष्ठराज.

सर्व श्रेष्ठ तत्वांना ब्रह्म असे म्हणतात. सगळ्या ब्रह्मांचे अधिपती, श्री ब्रह्मणस्पती. त्यामुळे परंपार.

ओंकार ब्रह्म हेच ज्यांचे स्वरूप आहे असे.

आम्नायगर्भ- आम्नाय म्हणजे वेद, शास्त्र. त्याचा गर्भ अर्थात अंतस्थ अर्थ. कथनीय. भावार्थ. रहस्य. असे ते आम्नायगर्भ.

प्रगल्भ अर्थात परिपूर्ण.पूर्ण विकसित. प्रफुल्लित.

पुराण अर्थात प्राचीनतम.आदितत्व. मूलतत्व.

अशा स्वरूपात वर वर्णिलेल्या स्वरूपात शास्त्रकार ज्यांचे वर्णन करतात त्यांना मी वंदन करतो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

२०) श्री गणेश भुजंगस्तोत्र- ८

चिदानंदसान्द्राय शान्ताय तुभ्यं !
नमो विश्वकर्त्रे च हर्त्रे च तुभ्यम् !!
नमोऽनन्तलीलाय कैवल्यभासे !
नमो विश्वबीज प्रसीदेशसूनो !!८!!

चिदानंदसान्द्र- चित्, आनंद आणि सांद्र असे तीन शब्द आहेत येथे. चित् शब्दाचा अर्थ ज्ञान, चैतन्य. आनंद म्हणजे आनंद. याला पर्यायवाचक शब्दच नाही. या दोन्हींनी सांद्र. सांद्र हा शब्द मोठा सुंदर आहे. त्याचे दोन अर्थ दिले जातात. पहिला अर्थ आहे घन. अर्थात पूर्ण भरलेला, गच्च भरलेला. ज्ञानाने, आनंदाने परिपूर्ण.

सांद्र शब्दाचा दुसरा अर्थ आहे स्निग्ध. मोरया चित्-आनंद घन आहे. पण ही घनता शुष्क नाही. निश्चल नाही. त्याला सांद्र म्हणजे स्निग्धता आहे. ओलावा आहे. स्निग्धतेचा संबंध आहे प्रवाहिततेशी. ते चैतन्य,ते ज्ञान, तो आनंद भगवान गणेश भक्तांपर्यंत प्रवाहित करतात त्यामुळे त्यांना चिदानंदसान्द्र असे म्हणतात.

शान्ताय- भगवान गणेशांचे स्वरूप आहे शांत. माणूस अशांत तेव्हाच होतो जेव्हा एकतर त्याला काही मिळवायचे असते किंवा त्याच्या मनाविरुद्ध काही तरी होते.

भगवंताला काही मिळवायचे नाही आणि त्यांच्या मनाविरुद्ध पानही हलत नाही म्हणून त्यांना शान्त म्हणतात.

नमो विश्वकर्त्रे च हर्त्रे च- श्री गणेश अथर्वशीर्षाच्या त्वमेव केवलं कर्तासि! आणि त्वमेव केवलं हर्तासि ! चे हे कथन. हे मोरया तूच विश्वाचा कर्ता,धर्ता आणि हर्ता आहेस.

नमोऽनन्तलीलाय- भगवान श्रीगणेशांच्या लीलांना अंतपार नाही.

कैवल्यभास- येथे भास शब्दाचा अर्थ जाणीव. तर कैवल्य शब्दाचा अर्थ आहे ज्ञानाने प्राप्त होणारी अवस्था. त्या कैवल्य दशेतच ज्यांची जाणीव होत असते ते कैवल्यभास.

विश्वबीज- हे मोरया आपणच या संपूर्ण ब्रम्हांडाचे मूल बीजतत्व आहात.

हे ईशसूनु अर्थात शिवसुता आपणास वंदन असो. आपण मला प्रसीद अर्थात प्रसन्न व्हावे.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

२१) श्री गणेश भुजंगस्तोत्र -९

इमं सुस्तवं प्रातरुत्थाय भक्त्या !
पठेद्यस्तु मर्त्यो लभेत्सर्वकामान् !!
गणेशप्रसादेन सिध्यन्ति वाचो !
गणेशे विभौ दुर्लभं किं प्रसन्ने !!९!!

या अंतिम श्लोकात भगवान जगद्गुरु आदि शंकराचार्य स्वामी महाराज शिरस्त्याप्रमाणे फलश्रुती सादर करीत आहेत. अर्थात फलश्रुतीचे स्वरूप 'रोचनार्था फलश्रुतिः! ' अर्थात सामान्य वाचकांना प्रोत्साहित करण्यासाठी तिचा उपयोग असल्याने आचार्य श्री एकाच श्लोकात हा विषय मांडत आहेत.

प्रथम चरणात आचार्य श्री हे स्तोत्र केव्हा? आणि कसे ? म्हणावे ते सांगत आहेत.

हे स्तोत्र सकाळी म्हणायचे आहे. इथे सकाळ हा शब्द केवळ काळ या अर्थानेच नाही. रात्र शब्दाचा अर्थ आहे अंधःकार. निद्रा. अज्ञान. त्यातून बाहेर पडणे हीच जागृती. ती जागृती जे घडवून आणतात ते चरण आहेत मोरयाचे.

भगवंता शिवाय आणि कशानेही सुख वाटणे हेच अज्ञान. ते गेल्यावर येणारी अनन्यशरणता हीच जागृती. त्यानंतर मनात येणारे विशुद्ध भाव हीच भक्ती. जागृतीच्या सकाळी या अनन्यशरण भक्तीने युक्त होऊन या सुंदर स्तोत्राचे गायन करावे, असे आचार्य श्री सांगत आहेत.

लभेत्सर्वकामान्- अशा रीतीने जो मर्त्य म्हणजे मानव या स्तोत्राचे पठण करील त्याला काय मिळेल? या प्रश्नाचे आचार्यांनी एकाच शब्दात दिलेले उत्तर आहे लभेत्सर्वकामान् ! अर्थात जे जे मनात असेल ते सर्व प्राप्त होईल.

बाह्य जगाबाबत तर हे घडेलच पण खरा विषय आहे जे मनात असेल म्हणजे स्वतः भगवंताची प्राप्ती. कारण वर सांगितलेल्या अनन्यशरण भक्ताच्या मनात तेच असतात.

गणेशप्रसादेन सिध्यन्ति वाचो- आचार्य श्री येथे एका वेगळ्याच फळाचे वर्णन करीत आहेत. ते म्हणतात या स्तोत्राच्या पठणाने श्रीगणेश कृपेने वाचासिद्धी प्राप्त होते. असा भक्त जे बोलतो ते खरे होते. पुन्हा विषय केवळ व्यवहाराचा नाही. असा भक्त केवळ भगवंताचे नाव घेत राहतो. त्याला त्याआधारे नामीची प्राप्ती होते. भगवंताची प्राप्ती होते.

गणेशे विभौ दुर्लभं किं प्रसन्ने ! हे अंतिम चरण किती गोड आहे? एकदा मोरया प्रसन्न झाला की मग जगात दुर्लभ काय आहे?

श्री मुदगल पुराण यासाठी वर्णन करते, ' 'किं दुर्लभं विघ्नहरे प्रसन्ने !'

जय गजानन.